विदर्भ, मराठवाडा व उत्तर महाराष्ट्राच्या जलद विकासासाठी राबवावयाच्या उपाय योजनांचा विशेष कार्यक्रम - २०१८ अंतर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील एकुण मंजूर अनुदानापैकी ६० टक्केच्या मर्यादेत अनुदान वितरीत करण्याबाबत.
(कार्यक्रमांतर्गत)

महाराष्ट्र शासन
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्रमांक : कृषिवि-३७१८/प्र. क्र. १५१/७-अे,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३१ मार्च, २०२०

वाचा :- १) शासन निर्णय,कृषि व पदुम विभाग क्रमांक - कृषिवि-१७९९/प्र.क्र.१७४/२०-अे, दिनांक १८/१२/२०००,
२) शासन निर्णय,कृषि व पदुम विभाग क्रमांक - कृषिवि-३७१९/प्र.क्र.४५/७-अे, दिनांक ०८/०५/२०१९,
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक - अर्थसं - २०१९/प्र.क्र. ९२/अर्थसंकल्प-३, दिनांक ०८ जुलै, २०१९,
४) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्रमांक अंदाज-२०१९/ (प्र.क्र.२३/१९)/२-अे, दिनांक १२ जुलै, २०१९.
५) शासन निर्णय,कृषि व पदुम विभाग क्रमांक - कृषिवि-३७१९/प्र.क्र.४५/७-अे, दिनांक ०९/०८/२०१९,

प्रस्तावना :-

उपरोक्त संदर्भ क्रमांक - (१) येथील शासन निर्णय दिनांक १८/१२/२००० अन्वये सन २०००-२००१ या आर्थिक वर्षापासून राज्यातील कृषि विद्यापीठांना अनुदान मंजूर करण्यासाठी सुधारित सहायक अनुदान सुत्र विहीत केले आहे. त्यानुसार संदर्भ क्रमांक ३) येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये, एकुण अर्थसंकल्पीत अनुदानापैकी ६० % च्या मर्यादेत अनुदान वितरीत करण्यास मान्यता दिलेली आहे. त्यास अनुसरुन, संदर्भ क्र. ५) येथील शासन निर्णयान्वये, विदर्भ, मराठवाडा व उत्तर महाराष्ट्राच्या जलद विकासासाठी राबवावयाच्या उपाय योजनांचा विशेष कार्यक्रम - २०१८ अंतर्गत मंजूर निधी वगळून उवर्रीत बाबींकरीता ६० टक्केच्या मर्यादेत निधी वितरीत करण्यात आला आहे. -

विदर्भ, मराठवाडा व उत्तर महाराष्ट्राच्या जलद विकासासाठी राबवावयाच्या उपाय योजनांचा विशेष कार्यक्रम-२०१८ अंतर्गत, सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरीता, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विदयापीठ, अकोला व वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी यांचे बळकटीकरणासाठी

प्रत्येकी रु. २०.०० कोटी निधी अर्थसंकल्पीत आहे. विद्यापीठांतर्गत ज्या बांधकामांना शासनाची प्रशासकीय मान्यता प्राप्त झालेली आहे, तथापि निधी अभावी कामे अदयाप अपुर्ण आहेत अशा कामांना निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

विदर्भ, मराठवाडा व उत्तर महाराष्ट्राच्या जलद विकासासाठी राबवावयाच्या उपाय योजनांचा विशेष कार्यक्रम-२०१८ अंतर्गत सुधारीत अंदाजापैकी रु. २२,००,०१,००० /- (अक्षरी रुपये बावीस कोटी एक हजार रुपये फक्त) शासन निर्णयात नमूद अटी व शर्तींच्या अधिन राहून वितरीत करण्यास शासन मंजुरी देत आहे.

**(रुपये हजारात)**

| अ.क्र. | **लेखाशिर्ष** | **उद्दिष्ट / बाब** | **आहरण व संवितरण अधिकारी** | **सन २०१९-२० करिता सुधारीत अंदाज** | **यापुर्वी वितरीत केलेले अनुदान** | **वितरीत करावयाचे उर्वरीत अनुदान** |
|---|---|---|---|---|---|---|
| **१.** | **२.** | **३.** | **४.** | **५.** | **६.** | **७.** |
| **अ) डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला, जिल्हा - अकोला** | | | | | | |
| ७. | **०१, पीक संवर्धन** १२०, इतर संस्थाना सहाय्य (००)(०८) डॉ.पं.दे.कृ. वि.ला सहायक अनुदान **(२४१५ ००९९)** | ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | उप विभागीय कृषि अधिकारी, अकोला. | ९९,६८ | ९९,६८ | ० |
| | | ३५, भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान | | १७,५०,०१ | ३,००,०० | **१४,५०,०१** |
| | | ३६, सहायक अनुदाने (वेतन) | | ६,६७ | ६,६७ | ० |
| | | **एकूण** | | **१८,५६,३६** | **४०,६३५** | **१४,५०,०१** |
| **ब) वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी** | | | | | | |
| १०. | **०१, पीक संवर्धन** १२०, इतर संस्थाना सहाय्य (००)(०९) ) व.ना.म.कृ. वि.ला सहायक अनुदान **(२४१५ ०१०५)** | ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | उप विभागीय कृषि अधिकारी, परभणी | ९४,५० | ९४,५० | ० |
| | | ३५, भांडवली मत्तेच्या निर्मिती करीता अनुदान | | १०,५०,०० | ३,००,०० | **७,५०,००** |
| | | ३६, सहायक अनुदाने (वेतन) | | ३,८७,२७ | ३,८७,२७ | ० |
| | | **एकूण** | | **१५,३१,७७** | **७,८१,७७** | **७,५०,००** |
| **एकूण (अ+ब) एकूण** | | | | **३३,८८,१३** | **११,८८,१२** | **२२,००,०१** |

(विद्यापीठ निहाय महाविद्यालये / संशोधन केंद्र निहाय अर्थसंकल्पीत करण्यांत आलेला निधी व वितरीत करावयाचे अनुदान याबाबतचे विवरणपत्र सोबत जोडले आहे.)

## अटी व शर्ती

१) उपलेखाशिर्षनिहाय, गटनिहाय, योजनानिहाय व बाबनिहाय वितरीत केलेला निधी कोणत्याही कारणास्तव अखर्चित / शिल्लक राहीला / राहणार असेल तर सदर अखर्चित / शिल्लक निधी शासनाचे मान्यतेशिवाय इतर गटांसाठी / योजनांसाठी / बाबींसाठी परस्पर वर्ग करु नये किंवा खर्च करु नये.

२) प्रत्येक गटामधील वितरीत केलेले सहाय्यक अनुदान / महसूली उत्पन्न त्या गटातील अनुज्ञेय बाबींवरील खर्च भागविण्यासाठी आणि विकास कामे करण्यासाठी उपयोगात आणावे. एका गटाचे सहायक अनुदान आणि महसूली उत्पन्न दुस-या गटातील योजनां / बाबींसाठी वर्ग करु नये. एखाद्या गटातील योजनेसाठी जास्त सहायक अनुदान वितरीत झाले असेल तर, पुढील निधीची मागणी करताना सदर जास्तीचे अनुदान विचारात घेऊन तेवढ्या कमी व अनुज्ञेय निधीची मागणी करावी.

३) प्रत्येक उपलेखाशीर्ष / गट/योजना आणि बाब निहाय स्वतंत्र लेखे / हिशोब ठेवावेत.

४) ज्या योजनांतर्गत / योजनेतर योजनांचा कालावधी संपलेला आहे, अशा योजना संबंधित कालावधीनंतर शासनाची मान्यता मिळाल्याशिवाय योजनेतर/योजनांतर्गत खर्चाने पुढे चालू ठेऊ नयेत.

५) महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषदेने, कृषि विद्यापीठांना मंजूर केलेले सहाय्यक अनुदान, अनुदान सुत्राप्रमाणे बरोबर आहे किंवा कसे, तसेच विहीत आदेश / कार्यपध्दतीनुसार खर्च करण्यात येत आहे किंवा कसे, याबाबत प्रत्येक आर्थिक वर्षाचा मुल्यमापन अहवाल शासनास संबंधित आर्थिक वर्ष समाप्त झाल्यापासून तीन महिन्यांच्या कालावधीत सादर करावा. तसेच, मागील आर्थिक वर्षाचा अखर्चित निधी किती आहे हे तात्काळ शासनास कळवावे.

६) विद्यापीठांना मंजूर करण्यात आलेले अनुदान महाराष्ट्र कृषि विद्यापीठे अधिनियम १९८३, महाराष्ट्र कृषि विद्यापीठे परिनियम १९९०, आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठे लेखा संहिता १९९१ मधील तरतूदीप्रमाणे आणि प्रचलित शासन आदेश व विहित कार्यपध्दतीनुसार सक्षम अधिका-यांची प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेतल्यानंतर विहीत मर्यादेत खर्च करण्यात यावे. केवळ अर्थसंकल्पीय तरतूद आहे किंवा अनुदान वितरीत केले आहे म्हणून खर्च करु नये.

७) सन २०१९-२०२० मधील अनुदानाची मागणी करताना, विद्यापीठाने दरमहा १० तारखेपर्यंत योजनानिहाय वितरीत केलेले अनुदान, प्रत्यक्ष खर्च आणि शिल्लक अनुदान याबाबतचा अहवाल सादर करावा. यापुढे अनुदानाची मागणी सादर करताना, पूर्वी वितरीत केलेल्या अनुदानातील शिल्लकीची प्रस्तावित मागणीशी सांगड घालून, प्रत्यक्षात आवश्यक तेवढ्याच अनुदानाची मागणी करण्यात यावी.

८) विद्यापीठाच्या नियंत्रक आणि इतर संबंधित सक्षम प्राधिका-यांनी उपरोक्त अटी व शर्तीचे काटेकोरपणे अनुपालन करावे.

९) सोबतच्या विवरणपत्रात मंजूर केलेले अनुदान उपविभागीय कृषि अधिकारी, अकोला व उपविभागीय कृषि अधिकारी, परभणी या आहरण व संवितरण अधिकारी यांनी संबंधित उपशीर्षांतर्गत शासन निर्णय कृषि व सहकार विभाग क्रमांक अेजीयु-१०७२/१८४७१/व्ही, दिनांक २७ सप्टेंबर १९७२ आणि शासन निर्णय क्रमांक कृषिवि- २००३/सीआर-३५/२०-अे, दिनांक २५/४/२००३ मध्ये नमूद केल्याप्रमाणे कृषि विद्यापीठांचे नियंत्रक यांना अदा करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करावी.

१०) या प्रित्यर्थचा खर्च सन २०१९-२०२० च्या अंदाजपत्रकात नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली मंजूर केलेल्या तरतूदीतून मासिक निधी विवरणपत्राच्या मर्यादेत भागवावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

हे आदेश महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१) १९७७ मधील परिच्छेद १४२ व १४४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या शक्तीनुसार व वित्त विभागाने दिलेल्या मंजूरीनुसार विभागाच्या स्तरावर निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२००३३११४२१५१६२०१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Gite Pratap Venkatrao

Digitally signed by Gite Pratap Venkatrao
DN: CN = Gite Pratap Venkatrao, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Agriculture and Animal Husbandry, Dairying and Fisheries Department
Date: 2020.03.31 14:26:12 +05'30'

(प्रताप व्य.गिते)
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. सदस्य सचिव तथा महासंचालक / सल्लागार (वित्त), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे,
२. संचालक (कृषि प्रक्रिया व नियोजन), कृषि आयुक्तालय, पुणे-१,
३. कुलगुरु / कुलसचिव / नियंत्रक / विद्यापीठ अभियंता, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी,
४. कुलगुरु / कुलसचिव / नियंत्रक / विद्यापीठा अभियंता, डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला,
५. उपविभागीय कृषि अधिकारी, अकोला / परभणी,
६. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
७. जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला, जिल्हा अकोला,
८. उपकोषागार अधिकारी, अकोला, जिल्हा अकोला,
९. जिल्हा कोषागार अधिकारी, परभणी, जिल्हा परभणी,
१०. उपकोषागार अधिकारी, परभणी, जिल्हा परभणी,

११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

१२. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई,

१३. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,

१४. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,

१५. उप मुख्य लेखा परिक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,

१६. वित्त विभाग (व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,

१७. कक्ष अधिकारी, कार्यासन २अे / ६अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,

१८. कार्यासन ७-अे (निवडनस्ती), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

## कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई शासन निर्णय क्रमांक : कृषिवि-३७१८/प्र. क्र. १५१/७-अे, दि. ३१/०३/२०२० सोबतचे परिपत्रक

(विदर्भ, मराठवाडा व उत्तर महाराष्ट्राच्या जलद विकासासाठी राबवावयाच्या उपाय योजनांचा विशेष कार्यक्रम - २०१८ अंतर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील एकुण मंजूर अनुदानापैकी ६० टक्केच्या मर्यादेत निधी वितरण)

(रु. लाखात)

| अ.क्र. | कामाचे नाव | आहरण व संवितरण अधिकारी | एकुण मंजूर अनुदान | ६० टक्केच्या मर्यादेत वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|
| **अ)** | **डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला, (२४१५ ००९९), ३५- भांडवली मालमत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान** | | | |
| १ | कृषि संशोधन केंद्र, सिंदेवाही जि. चंद्रपूर केंद्राचे बळकटीकरण | उपविभागीय कृषि अधिकारी, अकोला | २०,००.०० | ३००.०० |
| २ | कृषि महाविद्यालय नागपूरचे महाराजबाग सर्वे क्र.३११ मौजा लेंड्रा व अंबाझरी येथे वनस्पती संशोधन क्षेत्रीय कार्यालय व सायंटिस्ट होमचे बांधकाम करणे. | | | १००.०० |
| ३ | अकोला येथे मुलींचे वसतीगृह बांधकाम करणे | | | २००.०० |
| ४ | अकोला येथे मुलांचे वसतीगृह बांधकाम करणे | | | २००.०० |
| ५ | नागपूर येथील कृषि महाविद्यालयाचे पदवी धारक विद्यार्थीनी करीता मुलींचे वसतीगृह इमारत बांधकाम करणे (स्नातकोत्तर) | | | २००.०० |
| ६ | नागपूर येथील कृषि महाविद्यालयाचे पदवी धारक मुलींचे वसतीगृहाचे दुसऱ्या माळयावरील भोजन कक्ष / मनोरंजन कक्षासह बांधकाम करणे | | | २००.०० |
| ७ | अकोला येथे उपहारगृह इमारतीचे बांधकाम करणे | | | २०.०० |
| ८ | कृषि महाविद्यालय नागपूरचे महाराजबाग सर्वे क्र.८३/४ मौजा लेंड्रा येथे माळी ट्रेनिंग सेंटरचे बांधकाम करणे | | | २३०.०० |
| | | **एकुण** | **२०,००.०० /-** | **१४५०.००/-** |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| **ब)** | **वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी (२४१५ ०१०५), ३५- भांडवली मालमत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान** | | | |
| १ | कृषि महाविद्यालय, गोळेगाव, जि. हिंगोली | उपविभागीय कृषि अधिकारी, परभणी | २०,००.०० | ५५०.०० |
| २ | कृषि पदव्युत्तर व्यवसाय व्यवस्थापन संस्था, चाकुर जि. लातूर | | | २००.०० |
| | | **एकुण** | २०,००.०० /- | ७५०.००/- |

Gite Pratap Venkatrao

Digitally signed by Gite Pratap Venkatrao
DN: CN = Gite Pratap Venkatrao, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Agriculture and Animal Husbandry, Dairying and Fisheries Department
Date: 2020.03.31 14:26:32 +05'30'

**(प्रताप व्य. गिते)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**